**कौटुंबिक न्यायालय, पुणे यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या १११७/प्र.क्र.२५३/का.९**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक:- ११ मार्च, २०२०.

पहा : १) प्रमुख न्यायाधीश,कौटुंबिक न्यायालय, पुणे यांचे पत्र जा.क्र.- आस्था/७५१/२०१९, दि.०४.११.२०१९.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

कौटुंबिक न्यायालय, पुणे यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये सदर न्यायालयाच्या आस्थापनेवरील १८ अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याची शासनास विनंती केली आहे. संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.१.३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार कौटुंबिक न्यायालय, पुणे येथील १८ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, पुणे यांच्या आस्थापनेवरील सोबतच्या परिशिष्ठ अ प्रमाणे दर्शविलेल्या एकूण १८ अस्थायी पदांना दि.१ मार्च, २०२० ते दि.३१ ऑगस्ट, २०२० पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, संकेतांक २०१४ ०३४१, ०१- वेतन या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शीर्षाखालील सन २०२०-२०२१ या वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२ फ़ेब्रुवारी, २०२० द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००३१२१५२५१७७९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.03.12 15:27:20 +05'30'

(उदय बा. शुक्ल)
विधि सल्लागार-नि-सह सचिव

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,
२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे,

३) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
४) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
६) वित्त विभाग व्यय-५,
७) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
८) निवड नस्ती.

शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक कौटुंन्या -१११७/प्र.क्र.२५३/का-नऊ
दिनांक: ११ मार्च, २०२० सोबतचे परिशिष्ट 'अ'
अस्थायी पदे : कौटुंबिक न्यायालय, पुणे (न्यायाधीश व त्यांचा सहाय्यभूत कर्मचारी वर्ग)

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | पदे निर्माण करण्यात आलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | न्यायाधिश | १ | एफसीपी १०९४/१०२/(७)नऊ, दि.१७.८.१९९६ |
| २. | विवाह समुपदेशक | २ | -"- |
| ३. | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १ | -"- |
| ४. | लघुलेखक(निम्नश्रेणी) | १ | -"- |
| ५. | अधिक्षक | १ | -"- |
| ६. | शिरस्तेदार | १ | -"- |
| ७. | दुभाषी | १ | एफसीपी १०९०/६०८/(१०६)/९, दि.१८.२.१९९३ |
| ८. | सहाय्यक शिरस्तेदार | १ | एफसीपी १०९४/१०२/(७)नऊ, दि.१७.८.१९९६ |
| ९. | अभिसाक्ष लेखनिक | १ | -"- |
| १०. | कनिष्ठ लिपिक | २ | एफसीपी १०९४/१०२/(७)नऊ, दि.१७.८.१९९६ आणि सीआरसी ४७८५/४५/(९)अकरा, दि.३.१.१९८९ |
| ११. | बेलिफ | १ | एफसीपी १०९४/१०२/(७)नऊ, दि.१७.८.१९९६ |
| १२. | हवालदार | १ | -"- |
| १३. | शिपाई | २ | -"- |
| १४. | पहारेकरी | १ | सीआरसी ४७९०/१०९७/(१६३)/९, दि.१५.१.१९९७ |
| १५. | सफाईगार | १ | एफसीपी १०९४/१०२/(७)नऊ, दि.१७.८.१९९६ |
| **एकूण पदे १८ (अठरा)** | | | |